वितरण आदेश

**नवीन राष्ट्रीय बायोगॅस व सेंद्रीय खत कार्यक्रमांतर्गत सन २०१९-२०२० या आर्थिक वर्षासाठीची टर्न कि फी शुल्क (सयंत्र डागडूजी) रक्कम वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**ग्राम विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः बीजीएस २०२२/प्र.क्र.४४/योजना-५**

बांधकाम भवन इमारत, २५, मर्झबान पथ,
फोर्ट, मुंबई- ४०० ००१
दिनांक : १४ मार्च, २०२३

**वाचा :-**

१) केंद्र शासनाचे पत्र क्र. २५३/१६/२०१७ - BIOGAS, दिनांक ३० मे, २०१८
२) केंद्र शासनाचे पत्र क्रमांक : २५३/१६/२०१७-BIOGAS , दिनांक १० जुलै, २०१९
३) शासन पत्र क्रमांक बीजीएस-२०१९/प्र.क्र.४०/योजना-१, दिनांक ०६ ऑगस्ट, २०१९
४) केंद्र शासनाचे पत्र क्र. २५३/३४/२०१९-BIOGAS (Gen), दिनांक २७ सप्टेंबर, २०१९
५) ग्राम विकास विभाग शासन निर्णय क्रमांक बीजीएस-२०१८/प्र.क्र.९०/यो-१, दि.१२ जुलै, २०१९.
६) शासन निर्णय क्रमांक बीजीएस-२०१९/प्र.क्र.४०/योजना-१, दिनांक २० नोव्हेंबर, २०१९.
७) शासन निर्णय क्रमांक बीजीएस-२०१९/प्र.क्र.४०/योजना-१/५, दिनांक १९ मार्च, २०२०.
८) शासन निर्णय क्रमांक बीजीएस-२०१९/प्र.क्र.४०/योजना-१, दिनांक ११ नोव्हेंबर, २०२०.
९) शासन निर्णय क्रमांक बीजीएस-२०१९/प्र.क्र.४०/योजना-१, दिनांक २६ मार्च, २०२१.

**प्रस्तावना :-**

नवीन राष्ट्रीय बायोगॅस व सेंद्रीय खत कार्यक्रम ही १००% केंद्र पुरस्कृत योजना आहे. संदर्भिय पत्र क्र. ४ अन्वये सदर योजनेसाठी सन २०१९-२० करीता राज्यस्तरावरील PFMS प्रणालीसाठी नोंदणी करण्यात आलेल्या बँकेच्या बचत खाते क्रमांक ११४४०००१०५११७२५२ मध्ये रू. ३.९० कोटी इतका निधी जमा करण्यात आल्याचे कळविले आहे. संदर्भिय निर्णय क्र. ५ अन्वये “नवीन राष्ट्रीय बायोगॅस व सेंद्रीय खत व्यवस्थापन कार्यक्रम (NNBOMP)” या योजनेच्या अनुषंगाने, निधी आहरण व संवितरण करणेसाठी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, ठाणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात आलेले आहे. तसेच मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, ठाणे यांना “आहरण व संवितरण अधिकारी” म्हणून घोषित करण्यात आलेले आहे. संदर्भिय पत्र क्र. २ अन्वये केंद्र शासनाकडून सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरिता राज्यास ८५०० बायोगॅस संयंत्राचे उद्दिष्ट मंजूर केलेले होते. त्यानुसार संदर्भिय क्र. ३ अन्वये सन २०१९-२० करिता राज्यातील सर्व जिल्हा परिषदांना त्यांच्या मागणीनुसार एकूण ७५०० बायोगॅस संयंत्राचे उदिष्ट कळविलेले आहे. त्यानुसार सन २०१९-२० या वर्षाकरिता अनुदान वितरीत करण्याच्या अनुषंगाने ५०% अनुदान संदर्भिय शासन निर्णय क्र. ६ अन्वये रक्कम रु. ४,७०,८२,५००/- व ५०% अनुदान रक्कम संदर्भिय शासन निर्णय क्र. ७ अन्वये रु. ४,७०,८२,५००/- व संदर्भिय शासन निर्णय क्र. ८ अन्वये रु. १,२०,०००००/- तसेच संदर्भिय शासन निर्णय क्र. ९ अन्वये रु. ३,५०,८२,५००/- राज्यस्तरावरील PFMS प्रणालींसाठी नोंदणी करण्यात आलेल्या पंजाब नॅशनल बँक, ठाणे शाखा येथील बचत खाते क्रमांक ११४४०००१०५११७२५२ यावर उपलब्ध करून देण्यात आलेली आहे.

२. संदर्भिय शासन निर्णय क्र. ६ मधील रकाना क्रमांक २१ मध्ये नमूद सन २०१९-२० या आर्थिक वर्षातील टर्न कि फी शुल्क ही रक्कम जिल्हयांच्या मागणी प्रमाणे स्वतंत्र आदेशाद्वारे जिल्हयांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

नवीन राष्ट्रीय बायोगॅस व सेंद्रीय खत कार्यक्रमासाठी सन २०१९-२० या आर्थिक वर्षासाठी बायोगॅस संयंत्र बांधकाम व अनुषंगिक बाबींसाठी संदर्भिय शासन निर्णय क्र. ६ मधील शासन निर्णयान्वये एकूण रू. ६,६३,३२,५००/- ( रू. सहा कोटी त्रेसष्ट लक्ष बत्तीस हजार पाचशे मात्र ) इतका निधी खर्च करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. यापैकी केंद्र शासनाकडून उक्त संदर्भीय पत्र क्रमांक ४ अन्वये रू. ३,९०,००,०००/- ( रू. तीन कोटी नव्वद लक्ष मात्र ) इतका निधी प्राप्त झालेला असून सदर निधी संदर्भ राज्यस्तरीय बँक बचत खात्यामध्ये जमा करण्यात आला होता. उर्वरित निधी शासनाने अर्थसंकल्पिय प्रणालींवर उपलब्ध करून दिलेल्या रू. ५.०० कोटी मधून रू. २,७३,३२,५००/- ( रु.दोन कोटी त्र्याहत्तर लक्ष बत्तीस हजार पाचशे मात्र ) इतका राज्यस्तरावरील PFMS प्रणालीसाठी नोंदणी करण्यात आलेल्या पंजाब नॅशनल बँक, ठाणे शाखा येथील बँक बचत खाते क्रमांक ११४४०००१०५११७२५२ यावर उपलब्ध करून देण्यात आलेला आहे.

३. सदर निधीपैकी, या बचत खात्याचे “आहरण व संवितरण अधिकारी” म्हणून घोषित केलेले मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, ठाणे यांनी PFMS प्रणालीद्वारे संदर्भिय शासन निर्णय क्र. ६ मधील रकाना क्रमांक २० मध्ये नमूद केल्याप्रमाणे एकूण रक्कम रू. ४,७०,८२,५००/- (रू. चार कोटी सत्तर लक्ष ब्याऐंशी हजार पाचशे मात्र) संबंधित जिल्हयांना वितरीत करण्यासाठीचे आदेश निर्गमित केले आहेत. सदर शासन निर्णयातील रकाना क्रमांक २१ मध्ये नमूद टर्न कि फी शुल्क ही रक्कम जिल्हयांच्या मागणी प्रमाणे स्वतंत्र आदेशाद्वारे जिल्हयांना वितरीत करण्याचे नमूद असल्याने जिल्हयांची मागणी उपलब्ध करून रक्कम रु.१,८७,५०,०००/- ( रू. एक कोटी सत्त्याऐंशी लक्ष पन्नास हजार मात्र ) या रकमेपैकी पहिला, दुसरा व तिसरा हप्ता असा एकूण प्रति बायोगॅस संयंत्रास रु. २५००/- प्रमाणे एकूण रू. १,१९,२२,५००/-(रू. एक कोटी एकोणीस बावीस हजार पाचशे मात्र ) इतकी रक्कम वितरीत करण्याची मान्यता देण्यात येत आहे. सदर निधी दिनांक ३१ मार्च, २०२३ पर्यंत खर्च करणे बंधनकारक राहिल.

४. केंद्र शासनाच्या अपारंपरिक ऊर्जा स्त्रोत मंत्रालयाकडून मागण्या (क्लेम्स) पूर्णत: अदा केल्या जातील असे गृहीत धरुनच राज्य शासनाकडून जिल्हा परिषदांना उद्दिष्टांनुसार अनुदानाची रक्कम मंजूर करण्यात येते. या मागण्यांच्या बाबतीत केंद्र शासनाने नाकारलेली रक्कम यानंतर देण्यात येणाऱ्या अनुदानातून वळती करून घेण्यात येईल, याची कृपया नोंद घ्यावी.

५. सन २०१९-२० या आर्थिक वर्षात नवीन राष्ट्रीय बायोगॅस व सेंद्रीय खत कार्यक्रम ही योजना राबविण्यासाठी केंद्र शासनाने निर्गमित केलेल्या संदर्भ क्रमांक १ मध्ये नमूद केलेल्या मार्गदर्शक सूचनांप्रमाणे अनुदानाचे दर लागू राहतील.

६. राज्यस्तरावरील PFMS प्रणालीसाठी नोंदणी करण्यात आलेल्या पंजाब नॅशनल बँक, ठाणे शाखा येथील बँक बचत खाते क्रमांक ११४४०००१०५११७२५२ मध्ये वितरीत करण्यासाठी जमा

असलेल्या रू. १,८७,५०,०००/- ( रु. एक कोटी सत्त्याऐंशी लक्ष पन्नास हजार मात्र ) रक्कमेपैकी रू. १,१९,२२,५००/- ( रू. एक कोटी एकोणवीस बावीस हजार पाचशे मात्र ) इतका खर्च " मागणी क्रमांक एल-३, २८१० नवीन व नवीकरणीय ऊर्जा, ०१, बॉयो एनर्जी १०१, राष्ट्रीय बायोगॅस विकास कार्यक्रम (०१), राष्ट्रीय बायोगॅस व खत व्यवस्थापन कार्यक्रम (०१) (०१) गोबर गॅस संयंत्रे बसविणे ( २८१० ००१६ ) (केंद्र पुरस्कृत योजना १०० टक्के ) (कार्यक्रम ) ३३, अर्थसहाय्य " या लेखाशीर्षाखाली सन २०१९-२० या आर्थिक वर्षासाठी मंजूर असलेल्या तरतूदीतून करण्यात यावा.

७. या शासन निर्णयासोबत जोडलेल्या विवरणपत्रातील रकाना क्रमांक १४ मध्ये दर्शविलेल्या रक्कमेपेक्षा अधिक खर्च होणार नाही याची दक्षता आहरण व संवितरण अधिकारी यांनी घ्यावी.

८. सन २०१९-२० या आर्थिक वर्षात नवीन राष्ट्रीय बायोगॅस व सेंद्रीय खत कार्यक्रमासाठी वितरीत केल्या जाणाऱ्या अनुदानापैकी कोषागारातून आहरीत केलेल्या रक्कमेचे विहित नमुन्यातील उपयोगिता प्रमाणपत्र (ज्यामध्ये व्हाऊचर क्रमांक, अनुदान आहरित केल्याचा दिनांक, अनुदान आहरणाचे प्रयोजन, मुख्य लेखाशिर्ष, आऊटवर्ड नंबर, इत्यादी बाबीसह) महालेखाकार मुंबई व नागपूर यांना एप्रिल-२०२३ अखेर पर्यंत पाठविणे आवश्यक राहील. सन २०१९-२० च्या उपयोगिता प्रमाणपत्रासंबंधी महालेखापाल कार्यालय मुंबई/नागपूर यांचेकडुन मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद यांना प्राप्त झालेले Clearances Certificate मे-२०२३ पर्यंत शासनास पाठविण्याची जबाबदारी कृषी विकास अधिकारी, जिल्हा परिषद, ठाणे यांची राहील.

९. सदर योजनेच्या अंमलबजावणीसाठी दरवर्षी जिल्हा परिषदांना उद्दिष्टांच्या अनुषंगाने बाबनिहाय संपूर्ण अनुदान शासन स्तरावरून उपलब्ध करून देण्यात येते. त्यानुसार जिल्हा परिषदांनी पूर्ण केलेल्या भौतिक उद्दिष्टांच्या अनुषंगाने बाब निहाय खर्च करून आर्थिक वर्षअखेर ताळमेळ पूर्ण करावयाचे आहेत. बाबनिहाय रक्कम अखर्चित राहिल्यास, अशी शिल्लक रक्कम शासनास त्वरीत परत करण्यात यावी. अशी कोणतीही अखर्चित शिल्लक राहीलेली रक्कम पुढील आर्थिक वर्षात खर्च करता येणार नाही.

१०. प्रत्यक्ष केलेल्या खर्चाचे अचूक क्लेम्स (Claims) माहे जून, २०२३ अखेरपर्यंत शासनास सादर करण्यात यावेत. तसेच या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेले अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहे, त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे. नवीन राष्ट्रीय बायोगॅस व सेंद्रीय खत कार्यक्रम (NNBOMP) ही १००% केंद्र पुरस्कृत योजना असून, २० कलमी कार्यक्रमांच्या अंमलबजावणीचा घटक असल्याने मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद यांनी सदर आदेशानुसार या कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी तातडीने अनुदान वितरित करावे.

११. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अ.नौ.सं. क्र. ७८/१४४४ दिनांक २७.१०.२०२२ व वित्त विभागाच्या अ.नौ.सं.क्र. १५/अर्थोपाय, दि. ०२.०२.२०२३ अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेने व सहमतीने उक्त संदर्भ क्र. ५ येथील शासन निर्णयान्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार व दिलेल्या सूचनांनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०३१४१६१४५७२५२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ARUN VASANT SHINDE

Digitally signed by ARUN VASANT SHINDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=213d983c0c3b73519fa14c37396dd0b3cf8f28e16bc2fb6620a5c4fdac6e7284, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=672D36CC7468AA812E66DBB4704FFEB120DD58831284824F4FBEC2A6F6602199, cn=ARUN VASANT SHINDE
Date: 2023.03.14 17:25:46 +05'30'

**(अरुण व. शिंदे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. विभागीय आयुक्त (सर्व)
२. महालेखापाल महाराष्ट्र-१ मुंबई (लेखा परिक्षा)/ (लेखा व अनुज्ञेयता)
३. महालेखापाल महाराष्ट्र-२ नागपूर (लेखा परिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता)
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
५. मुख्य लेखा व वित्त अधिकारी , जिल्हा परिषद (सर्व)
६. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
७. कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
८. उप मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा (सर्व)
९. जिल्हा लेखा परिक्षक स्थानिक निधी लेखा (सर्व)
१०. संचालक, लेखा कोषागारे, महाराष्ट्र, मुंबई.
११. जिल्हा कोषगार अधिकारी (सर्व)
१२. नियोजन विभाग, कार्यासन १४४३/१४४४, मंत्रालय, मुंबई.
१३. वित्त विभाग, मंत्रालय (व्यय-१५ /अर्थ-१७), मंत्रालय, मुंबई.
१४. व्यवस्थापक, पंजाब नॅशनल बँक, शिल्पयान, शिवाजी पथ, जि. ठाणे ४०० ०६३
१५. कार्यासन क्रमांक वित्त-१, वित्त-२, वित्त-७, वित्त-८, योजना-२, ग्राम विकास विभाग.
१६. निवड नस्ती, कार्यासन योजना-५, ग्राम विकास विभाग.

शासन निर्णय क्रमांकः बीजीएस २०२२/प्र.क्र.४४/योजना-५ दिनांक : १४ मार्च, २०२३ सोबतचे परिशिष्ट “अ”

**सन २०१९-२० या आर्थिक वर्षात बायोगॅस कायक्रमाच्या अंमलबजावणीसाठी वितरीत करावयाचा निधी तपशिल**

| अ.क्र. | जिल्हा | सन २०१९-२० करीता जिल्हयांना दिलेले उद्दिष्ट व त्यानुसार झालेले साध्य | | | | | | | | दिनांक २० नोव्हेंबर, २०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये सन २०१९-२० करीता प्रति संयंत्र रू.२५०० /- प्रमाणे टर्न की फी शुल्क मंजूर रक्कम | टर्न की फी शुल्कसाठी एकूण संयंत्र संख्या व देय रक्कम | | **या शासन निर्णयान्वये वितरीत एकूण अनुदान रू.** |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | बायोगॅस संयंत्राचे प्रवर्गनिहाय उद्दिष्ट | | | | झालेले साध्य | | | | | | | |
| | | सर्वसाधारण | SC | ST | एकूण | सर्वसाधारण | SC | ST | एकूण | | एकूण संयंत्र संख्या | प्रति संयंत्र रू.२५०० /- प्रमाणे टर्न की फी देय रक्कम | |
| **१** | **२** | **३** | **४** | **५** | **६** | **७** | **८** | **९** | **१०** | **११** | **१२** | **१३** | **१४** |
| १ | ठाणे | २० | ० | १० | ३० | २० | ० | १० | ३० | ७५००० | ० | ० | ० |
| २ | पालघर | ३५ | ३ | ८७ | १२५ | ३३ | २ | ८६ | १२१ | ३१२५०० | ० | ० | ० |
| ३ | रायगड | १२६ | १३ | १४ | १५३ | १२१ | ९ | १४ | १४७ | ३८२५०० | ० | ० | ० |
| ४ | रत्नागिरी | १७७ | २३ | ० | २०० | १८७ | १० | ० | १९७ | ५००००० | ० | ० | ० |
| ५ | सिंधुदुर्ग | ४८५ | १५ | ० | ५०० | ४८६ | १४ | ० | ५०० | १२५०००० | ३८० | ९५०००० | ९५०००० |
| ६ | नाशिक | २०१ | ३२ | १९ | २५२ | २०८ | १२ | ४५ | २६५ | ६३०००० | ० | ० | ० |
| ७ | धुळे | २० | ५ | १७ | ४२ | २० | ५ | १७ | ४२ | १०५००० | ४२ | १०५००० | १०५००० |
| ८ | नंदुरबार | १८ | ० | ६४ | ८२ | १७ | ० | ६५ | ८२ | २०५००० | ८२ | २०५००० | २०५००० |
| ९ | जळगांव | ९० | ५ | ५ | १०० | ९० | ५ | ५ | १०० | २५०००० | १०० | २५०००० | २५०००० |
| १० | अहमदनगर | ६५० | ४५ | ५ | ७०० | ६७७ | १२ | ११ | ७०० | १७५०००० | ७०० | १७५०००० | १७५०००० |
| ११ | पुणे | ६३७ | १६ | २२ | ६७५ | ५५४ | १७ | ५६ | ६२७ | १६८७५०० | ४२३ | १०५७५०० | १०५७५०० |
| १२ | सातारा | २८५ | १५ | ० | ३०० | २९० | १० | ० | ३०० | ७५०००० | ६४ | १६०००० | १६०००० |
| १३ | सांगली | ३९५ | १५ | ० | ४१० | ३३३ | ९ | ० | ३४२ | १०२५००० | ० | ० | ० |
| १४ | सोलापूर | ४२० | ३० | ० | ४५० | ३८१ | २८ | ० | ४०९ | ११२५००० | ४०९ | १०२२५०० | १०२२५०० |
| १५ | कोल्हापूर | १०३१ | ३९ | ० | १०७० | १०४७ | २३ | ० | १०७० | २६७५००० | १०७० | २६७५००० | २६७५००० |
| १६ | औरंगाबाद | ४६४ | ३४ | २ | ५०० | ३८९ | १७ | १ | ४०७ | १२५०००० | ४०७ | १०१७५०० | १०१७५०० |
| १७ | जालना | १४२ | ८ | ० | १५० | ११० | ५ | ० | ११५ | ३७५००० | ८२ | २०५००० | २०५००० |
| १८ | परभणी | ८५ | १५ | ० | १०० | ८४ | १२ | ० | ९६ | २५०००० | ९६ | २४०००० | २४०००० |
| १९ | हिंगोली | ७५ | १५ | १० | १०० | ७५ | १५ | १० | १०० | २५०००० | १०० | २५०००० | २५०००० |

## सन २०१९-२० या आर्थिक वर्षात बायोगॅस कायक्रमाच्या अंमलबजावणीसाठी वितरीत करावयाचा निधी तपशिल

| अ.क्र. | जिल्हा | सन २०१९-२० करीता जिल्हयांना दिलेले उद्दिष्ट व त्यानुसार झालेले साध्य | | | | | | | | दिनांक २० नोव्हेंबर, २०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये सन २०१९-२० करीता प्रति संयंत्र रू.२५०० /- प्रमाणे टर्न की फी शुल्क मंजूर रक्कम | टर्न की फी शुल्कसाठी एकूण संयंत्र संख्या व देय रक्कम | | **या शासन निर्णयान्वये वितरीत एकूण अनुदान रू.** |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | बायोगॅस संयंत्राचे प्रवर्गनिहाय उद्दिष्ट | | | | झालेले साध्य | | | | | | | |
| | | सर्वसाधारण | SC | ST | एकूण | सर्वसाधारण | SC | ST | एकूण | | एकूण संयंत्र संख्या | प्रति संयंत्र रू.२५०० /- प्रमाणे टर्न की फी देय रक्कम | |
| **१** | **२** | **३** | **४** | **५** | **६** | **७** | **८** | **९** | **१०** | **११** | **१२** | **१३** | **१४** |
| २० | बीड | ८५ | १० | ५ | १०० | ८५ | १० | ५ | १०० | २५०००० | १०० | २५०००० | २५०००० |
| २१ | नांदेड | ८० | १५ | ५ | १०० | ८१ | ९ | ३ | ९३ | २५०००० | ९३ | २३२५०० | २३२५०० |
| २२ | उस्मानाबाद | १७६ | २४ | ० | २०० | १७६ | २४ | ० | २०० | ५००००० | २०० | ५००००० | ५००००० |
| २३ | लातूर | ७५ | २० | ५ | १०० | ७८ | १६ | ४ | ९८ | २५०००० | ९८ | २४५००० | २४५००० |
| २४ | अमरावती | ३८ | २२ | १० | ७० | ५२ | १२ | ६ | ७० | १७५००० | ७० | १७५००० | १७५००० |
| २५ | बुलढाणा | ९२ | १७ | ३ | ११२ | २२ | ६ | २ | ३० | २८०००० | ० | ० | ० |
| २६ | वाशिम | १० | १ | १ | १२ | १० | १ | १ | १२ | ३०००० | ० | ० | ० |
| २७ | अकोला | ५० | १७ | ३ | ७० | २२ | ६ | २ | ३० | १७५००० | ० | ० | ० |
| २८ | यवतमाळ | २८ | १८ | ४ | ५० | २८ | १३ | ९ | ५० | १२५००० | ५० | १२५००० | १२५००० |
| २९ | नागपूर | ५३ | २० | १० | ८३ | ६३ | १० | १० | ८३ | २०७५०० | ८३ | २०७५०० | २०७५०० |
| ३० | वर्धा | ७५ | २९ | १६ | १२० | ७५ | २९ | १६ | १२० | ३००००० | १२० | ३००००० | ३००००० |
| ३१ | भंडारा | ७४ | २० | १० | १०४ | ९० | ६ | ५ | १०१ | २६०००० | ० | ० | ० |
| ३२ | गोंदिया | १६३ | ७ | १० | १८० | ७८ | ७ | १० | ९५ | ४५०००० | ० | ० | ० |

| **सन २०१९-२० या आर्थिक वर्षात बायोगॅस कायक्रमाच्या अंमलबजावणीसाठी वितरीत करावयाचा निधी तपशिल** | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| अ.क्र. | जिल्हा | सन २०१९-२० करीता जिल्हयांना दिलेले उद्दिष्ट व त्यानुसार झालेले साध्य | | | | | | | | दिनांक २० नोव्हेंबर, २०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये सन २०१९-२० करीता प्रति संयंत्र रू.२५०० /- प्रमाणे टर्न की फी शुल्क मंजूर रक्कम | टर्न की फी शुल्कसाठी एकूण संयंत्र संख्या व देय रक्कम | | **या शासन निर्णयान्वये वितरीत एकूण अनुदान रू.** |
| | | बायोगॅस संयंत्राचे प्रवर्गनिहाय उद्दिष्ट | | | | झालेले साध्य | | | | | | | |
| | | सर्वसाधारण | SC | ST | एकूण | सर्वसाधारण | SC | ST | एकूण | | एकूण संयंत्र संख्या | प्रति संयंत्र रू.२५०० /- प्रमाणे टर्न की फी देय रक्कम | |
| ३३ | चंद्रपूर | १३५ | ३० | १५ | १८० | १३५ | ३० | १५ | १८० | ४५०००० | ० | ० | ० |
| ३४ | गडचिरोली | १० | १० | ६० | ८० | १६ | ९ | ३९ | ६४ | २००००० | ० | ० | ० |
| | **एकूण** | **६५००** | **५८८** | **४१२** | **७५००** | **६१८९** | **४१४** | **४३०** | **७०३३** | **१८७५००००** | **४७६९** | **११९२२५००** | **११९२२५००** |

ARUN VASANT SHINDE

Digitally signed by ARUN VASANT SHINDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=213d983c0c3b73519fa14c37396dd0b3cf8f28e16bc2fb6620a5c4fdac6e7284, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=672D36CC7468AA812E66DBB4704FFEB120DD58831284824F4FBEC2A6F6602199, cn=ARUN VASANT SHINDE
Date: 2023.03.14 17:26:36 +05'30'

( अरुण व. शिंदे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन